प्रशासकीय मान्यता

केंद्र शासनाच्या ११ व्या पंचवार्षीक योजनांतर्गत पदव्युत्तर अभ्यासक्रमाच्या श्रेणीवर्धन योजनेंतर्गत केंद्र शासन हिस्साअंतर्गत मंजूर अनुदानातून यंत्र खरेदीस प्रशासकीय मान्यता.

श्री. भाऊसाहेब हिरे शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, धुळे.

महाराष्ट्र शासन
वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,
शासन निर्णय, क्रमांक : बीसीडी-२०१९/प्र.क्र.२१२/प्रशा-१
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२,
दिनांक : २४ जानेवारी २०२०

**वाचा :**
१) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६
२) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक खरेदी-२०१६/प्र.क्र.२४०/ आरोग्य-८, दिनांक २६.०७.२०१७.
३) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक खरेदी-२०१६/प्र.क्र.२४०/ आरोग्य-८, दिनांक ०७.०३.२०१८
४) स्वास्त व कुटुंब कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्रमांक U.14017/31/2016-ME-II, दिनांक १०.०९.२०१८
५) संचालक वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई यांचे पत्र क्र:- संवैशिवसं/श्रीभाहिशावैमधु/यंत्र-खप्र/३-म/११८८३/१९, दिनांक १६.०८.२०१९
६) शासन पत्र क्रमांक पीजीएन २०१९/ प्र.क्र.२९५ / प्रशा-१, दिनांक १९.११.२०१९

शासन निर्णय :-

श्री. भाऊसाहेब हिरे शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, धुळे या संस्थेस संदर्भाधीन दिनांक १०.०९.२०१८ च्या पत्रान्वये केंद्र शासनाच्या ११ व्या पंचवार्षीक योजनांतर्गत पदव्युत्तर अभ्यासक्रमाच्या श्रेणीवर्धन योजनेंतर्गत केंद्र शासन हिस्साअंतर्गत मंजूर अनुदानातून उपलब्ध होणाऱ्या निधीतून पुढील तक्त्यात नमूद रुपये ८,६०,००,०००/- (रुपये आठ कोटी, साठ लक्ष फक्त) ची यंत्रसामुग्री खरेदी करण्यास या शासननिर्णयान्वये पुढील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मंजूरी देण्यात येत आहे.

| अ. क्र. | यंत्राचे नांव | नग | प्रती नग किंमत | एकूण किंमत |
|---|---|---|---|---|
| १ | १२८ स्लाईस सी.टी.स्कॅन मशीन विथ टर्न-कि बायबॅक | ०१ | ८,६०,००,००० | ८,६०,००,००० |

अटी :-

१. सदर प्रशासकीय मान्यता केंद्र शासनाच्या ११ व्या पंचवार्षीक योजनांतर्गत पदव्युत्तर अभ्यासक्रमाच्या श्रेणीवर्धन योजनेंतर्गत केंद्र शासनाचा राज्य शासनास प्राप्त झालेला निधी सदर आर्थिक वर्षात वापरण्यास परवानगी मिळणेबाबत उपरोक्त दिनांक १९.११.२०१९ च्या पत्रान्वये केंद्र शासनास पाठविलेल्या प्रस्तावास मान्यता मिळण्याच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

२. सदर यंत्रसामुग्री हाताळणीसाठी नव्याने पदनिर्मितीची आवश्यकता तसेच बांधकाम / विद्युतीकरणाची नाही, याबाबत संचालनालयाने व संबंधित अधिष्ठाता यांनी खातरजमा केली आहे.

३. सदर यंत्र सामुग्री संबंधित केंद्र- राज्य योजनेतंर्गत अनुज्ञेय आहे, याची खातरजमा संबधित संस्थेने केली आहे.

४. सदर विषयी "शासकीय विभागाने करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची नियमपुस्तिका" याबाबत उद्योग, ऊर्जा व कामगार व कामगार विभागाने निर्गमित केलेल्या शासन निर्णय क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६ मध्ये नमूद केलेल्या विहीत कार्यपध्दतीचे अनुपालन करण्यात यावे.

५. सदर यंत्रसामुग्री खरेदी विषयक प्रक्रिया "औषधे, तद्अनुषंगीक उपभोग्य वस्तू व वैद्यकीय उपकरणे या बाबींची खरेदी हाफकिन बायो-फामास्युटीकल्स कॉपोरेशन लि. मार्फत करण्याबाबत" निर्गमित शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक खरेदी-२०१६/ प्र.क्र.२४०/आरोग्य-८, दिनांक २६.०७.२०१७ नुसार करावी.

६. सदर यंत्रसामुग्रीची आवश्यकता असल्याचे व त्याची किंमत बाजारभावापेक्षा जास्त नसल्याची खात्री संचालक ( वै.शि. ) तसेच संबंधित अधिष्ठाता यांनी करावी.

७. सदर यंत्रसामुग्रीची विनिर्दिष्टे व्यापक, सर्वसमावेशक असून त्यानुसार यंत्रपुरवठा करु शकणारे किमान तीन उत्पादक/पुरवठादार यांचेकडून तीन निविदा प्राप्त होऊ शकतील अशा प्रकारची आहेत, असे संचालक (वै.शि.) यांनी प्रमाणित करावे.

८. प्रस्तावित यंत्रसामुग्रीचा समावेश इतरत्र कोणत्याही प्रस्तावात अंतर्भुत केलेला नसल्याबाबत व सदर यंत्रसामुग्री संबंधित संस्थेस आवश्यक असल्याबाबत संचालकांनी खात्री करावी.

९. मुख्य यंत्र व त्यांचे सुटे भाग (Accessories) यांच्या किंमती भिन्न दर्शविणे आवश्यक राहील.

१०. सदर विषयी यंत्रसामुग्री खरेदीबाबत निर्णय घेताना प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आलेल्या लेखाशिर्षाखाली मंजुर अनुदानाच्या तरतूदीपेक्षा जास्त खर्च केला जाणार नाही याची दक्षता घ्यावी.

११. उपरोक्त शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार व कामगार विभाग, दिनांक ०१.१२.२०१६ मधील परिच्छेद क्रमांक ३.१.२ "किंमतीचा अंदाज व किंमतीचा वाजवीपणा" या शीर्षकाखालील परिच्छेद क्रमांक ३.१.२.१ मधील तरतूदीचे खरेदी समितीने अनुपालन करावे. त्यानुषंगाने यंत्राच्या किंमतीस आवश्यकतेनुसार सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात येईल.

२. श्री. भाऊसाहेब हिरे शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, धुळे संस्थेने सदर प्रयोजनासाठी उपरोक्त तक्यात नमूद यंत्रसामुग्रीसाठी होणार खर्च खालील लेखाशिर्षांतर्गत निधीतून भागविण्यात यावा

मागणी क्र. एस - ०४

४२१०- वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य यांवरील भांडवली खर्च
०३- वैद्यकीय शिक्षण, प्रशिक्षण व संशोधन
१०५- विषमचिकित्सा
(००) (४२)- राज्य शासकीय वैद्यक महाविद्यालयांचे बळकटीकरण व दर्जावाढ करणे व नवीन पाठ्यक्रम सुरु करणे आणि पदव्युत्तर विद्यार्थ्यांच्या संख्येत वाढ करणे (केंद्र हिस्सा ७५ टक्के) (सीएसएस) (४२१० २४३८)
५२- यंत्रसामग्री व साधनसामग्री

३. शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक: विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, दिनांक १७.०४.२०१५ अन्वये तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-१, उप विभाग -२, अनुक्रमांक-३, नियम क्रमांक-७ अनुसार प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारान्वये हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००१२४१५४२४१८५१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे. महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ARUN MURLIDHARRAO DAHALE

Digitally signed by ARUN MURLIDHARRAO DAHALE
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=b335b52903c5914ab29c9ba5a50897b7b2244d66593f50dd713da83860912503, postalCode=400032,
street=MANTRALAYA ,MUMBAI,
serialNumber=30df743755280cf26ce97ec0978235f63f80f0bc4317129bf381eb48778f2e3d, ou=NA,
o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=ARUN MURLIDHARRAO DAHALE
Date: 2020.01.24 15:36:19 +05'30'

( अ. मु. डहाळे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. महालेखाकार - २ ( लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, नागपूर
२. व्यवस्थापकीय संचालक, हाफकिन बायो-फार्मास्युटीकल्स कॉपोरेशन लि., मुंबई.
३. अवर सचिव, स्वास्थ व कुटुंब कल्याण मंत्रालय (ME-II Section), निर्माण भवन, नवी दिल्ली

४. संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई.
५. अधिष्ठाता, श्री. भाऊसाहेब हिरे शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, धुळे
६. जिल्हा कोषागार अधिकारी, धुळे .
७. निवडनस्ती (प्रशा-१).